
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ६. जानेवारी १८८३. अंक १.

हें मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें.

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

# सूचना.

आम्हीं श्रीरामदासकृत रामायणापैकीं युद्धकांड छापण्यास ह्या अंकांत आरंभ केला आहे. दुसरीं तीन कांडेंही आम्हांस मिळालीं आहेत. तर यांच्या आणखी प्रती कोणापाशीं असल्यास त्या आमच्याकडे पाठविण्याची कृपा करावी म्हणजे शुद्ध करण्याच्या कामास मदत होईल. काम झालें म्हणजे ज्यांच्या त्यांस परत केल्या जातील.

**का० सं० व्यवस्थापक.**

---

# विषयक्रम.

# नागपूरकर भोंसल्यांची बखर.

## उपोद्घात.

१. **नागपूरकर भोंसल्यांच्या** संबंधाचे कागदपत्र छापण्यास आरंभ केला तेव्हां पासून आजपर्यंत सुमारें लहान मोठे चाळीस लेख छापून बाहेर पडले. या लेखांवरून **भोंसलेशाहींतील** अनेक गोष्टींची माहिती वाचकांस थोडी बहुत झाली असेलच. **नागपूरकर भोंसल्यांनीं** कोणते पराक्रम केले, त्यांचा उदय कसा झाला, त्यांची मूळपीठिका काय, त्यांनीं गोंडवण, बंगाला वगैरे प्रांत कसे काबीज केले, मूळ मराठी राज्याशीं व इतर संस्थानांशीं त्यांचे संबंध कसे होते, इंग्रज लोकांनीं व फ्रेंच लोकांनीं त्यांच्याशीं कोणत्या प्रकारचें वर्तन ठेविलें, व त्यांच्या राज्यास उत्तरोत्तर कोणत्या कारणांनीं उतरती कळा लागली ह्या गोष्टींबद्दल फारशी माहिती आपल्याकडील लोकांस नाहींच म्हटली तरी चालेल. तर ही माहिती प्रस्तुत बखरीच्या द्वारें व लेखांच्या द्वारें सादर करण्याचा विचार केला आहे.

२. **नागपूरकर भोंसल्यांचे** लेख प्रसिद्ध करण्यास आरंभ केला त्या समयीं दोन बखरी मिळाल्या होत्या. त्यानंतर आणखीही बखरी हातीं आल्या. त्यांच्या विषयीं दोन शब्द येथें लिहिणें इष्ट आहे. आम्हांपाशीं एकंदर सहा बखरी आहेत. ह्या अस्सल प्रतीवरून केलेल्या नकला आहेत. अस्सल बखरी आम्हीं स्वतः पाहिल्या असून त्यांच्या नकला मुळांशीं ताडून पाहण्याचें काम जितकें होईल तितकें चोख व निर्दोष करविलें आहे. अस्सल बखरींचें अक्षर सुवाच्य नसल्यामुळें नक्कल करतांना कांहीं ठिकाणीं जशींच्या तशींच अक्षरें लिहिण्याचा यत्न केला आहे.

(**अ**) पहिली बखर—**गुजाबादादा साहेब गुजर** व **नारायण गोपाळ पंडितजी** या दोघांस **मेहेरबान रेसिडेंट जेंकिन्स साहेब बहादूर** यांनीं विनंती केल्यावरून **गंगाधरराव माधव चिटणीस** यांनीं स्वतः लिहिली. ही सन १२३० फसलींत लिहिलेली असून हिचे मूळ बंद ४९ आहेत. या बखरीमध्यें भोंसल्यांची मूळपीठिका सांगून पुढें जानोजीच्या मरणापर्यंत हकीकत दिलेली आहे.

(**आ**) दुसरी बखर—या बखरीचे मूळ बंद १२० आहेत त्यांपैकीं ९३, ९४, ९५, ९६ व ९८ असे पांच बंद गहाळ जालेले आहेत. एवढा भाग त्रुटित झाला आहे तरी बखर उपयोगीं पडण्याजोगी आहे. ही बखर **खंडो भगवंत परभु** या नांवाच्या गृहस्थानें लिहिलेली आहे. **खंडो भगवंत** यांचे वडील **भगवंतराव** सुंदर हे **भोंसल्यांची** व **निजामाची** "साठ चाळिशी" बद्दल कांहीं तकरार पडली होती तेव्हां **निजामाकडे** तह करण्याकरितां गेले होते.

अनुक्रमणिका

खंडो भगवंत हे स्वतः गंगाधरराव माधव चिटणीस ह्यांचे हाताखालीं नायब चिटणविशीचे कामावर होते. यांचे पूर्वज शंकराजी रखमाजी प्रभु हे थोरल्या रघोजीचे दिवाण व पोतनीस होते. शंकराजीचे पुतणे सुंदर बहिराजी हे जामदारखान्यांत व शिलेखान्यांत मुख्य कामदार होते. सुंदरराव यांचे भगवंतराव हे पुत्रचतुष्टयापैकीं द्वितीय पुत्र होत. खंडो भगवंतकृत बखरींत जानोजीच्या मरणापासून तों दुसऱ्या रघोजीच्या मरणापर्यंत समग्र वृत्तांत आहे.

( इ ) तिसरी बखर—हिचे १९ बंद आहेत. परंतु पहिले दोन बंद गाहाळ जालेले आहेत. बाकी सर्व पत्रें शाबूद आहेत. ही केव्हां लिहिलेली हें हिचा आद्य भाग उपलब्ध नसल्यामुळें समजत नाहीं. हींत आरंभापासून तों जानोजीच्या मरणापर्यंत संक्षिप्त हकीकत दिलेली आहे. हींतील उतारे टिपांच्या रूपानें कोठें कोठें देतां येतील. ही कोणी लिहिली हेंही समजण्यास मार्ग नाहीं.

( ई ) चवथी बखर—ही शके १७३८ धातानाम संवत्सरीं मे० जेंकिन्स साहेबांसाठीं व स्वमित्र मंडळासाठीं यजुर्वेदाधिकारी विनायक आनन्दराव औरंगाबादकर यांनीं लिहिली. ही मोठ्या बंदावर लिहिलेली असून ते २०८ आहेत. हिजमध्यें तहनामे, यादी, सवाल जबाब, हिशेब, पत्रव्यवहार, सनदा इत्यादि अनेक उपयुक्त लेखांचा थोडासा समावेश केला आहे. हीच बखर छापण्यास आरंभ केला असता, परंतु हिच्या लेखनपद्धतींत फार गोंधळ झालेला आहे. या बखरींत पेशव्यांच्या बखरीचाही कांहीं अंश मधून मधून आलेला दिसतो, हिचाही टिपांतच पुष्कळ उपयोग होईल. या बखरींत यशवंतराव रामचंद्र, अमृतराव पांडुरंग, साबाजी बारीदार, बळवंतराव साल्पेकर यांच्या लेखांचाही समावेश केला आहे. विनायकराव औरंगाबादकर यांचे वंशज नागपुरास आहेत.

( उ ) पांचवी बखर---ही पूर्वोक्त विनायकराव औरंगाबादकर यांनीं लिहिलेली आहे. ही फार लहान आहे. हीजमध्यें चवथ्या बखरी सारखा गोंधळाचा प्रकार नाहीं; ही बखर प्रसंगविशेषीं जो मजकूर साहव्या बखरींत दुर्बोध आहे तो सुबोध करण्यास साधनीभूत होईल. ही शके १७३८ मध्येंच लिहिलेली आहे व हींत सन १८०९ पर्यंत हकीकत दिली आहे.

( ऊ ) सहावी बखर—ही बळवंतराव मल्हिपत गुप्ते यांचे पुतणे काशिराव राजेश्वर गुप्ते यांनीं लिहिली. ही प्रतीवरून तयार केलेली प्रत आहे. ही शके १७४४ त मे० जेंकिन्स साहेबांसाठीं लिहिली. हीच छापण्यास आरंभ केला आहे. हींत आरंभापासून दुसऱ्या रघोजीच्या मरणापर्यंत हकीकत असून परसोजी ऊर्फ बाळासाहेब व मुधोजी ऊर्फ आपासाहेब यांच्या कारकीर्दीचें वर्णन आहे.

---

अनुक्रमणिका

श्री.

# नागपूरकर भोंसल्यांची बखर.

## मूलपीठिका.

---

श्रीनृपशालिवाहन शके १७४४ फसली सन १२३२ चित्रभानुनाम संवत्सरे यासालीं मिस्तर रिचर्ड जेंकिन्स् साहेब आलीशान बाहादूर यांणीं मिस्तर वल्किसन साहेब बाहादूर यांस सांगितलें कीं, श्रीमंत राजेश्री सेनासाहेब सुभा यांचा सिलसिला व हें पद प्राप्तीचें कारण काय याचा तपसील, सेनासाहेब यांचे दौलतींत कोण कसे वागले, कोणते वेळेस कोणता मुलूख प्राप्त झाला, याचा बयाण, जे कोणी वाकबगार असतील त्यांजला, विचारून लिहावा, याजवरून त्यांणीं विनंती लिहिली ऐसीजे. आमच्या चुलत्यां पासोन सिलसिला पेशजी श्रीमंत सेनासाहेबसुभा यांणीं तयार केला होता तो सिलसिला तयार करून साहेबांचे स्वाधीन केला. त्यांपैकीं कागदपत्र गाहाळ झाले व जुन्या सनदाच्या नकला पाहिल्या व वडिलांची माहिती वागणूक अव्वल पासोन त्यांच्या मुखें ऐकिल्या होत्या, त्याजवरून आमचे चुलते बळवंतराव माहिपत गुप्ते यांचेही तोंडानें ऐकिलें; व कांहीं कांहीं यथामति जें सुचलें व वागणुकींत पाहिल्यावरून विनंति लिहिण्यांत आली असे.

श्रीशालिवाहन शकांत यवनीपातशाही झाली. त्यांत अकबर पातशाहा झाले. यांजला समजलें कीं उदेपूरवाले राणाजी यांचे सासरे पन्हाळ रजपूत यांचे येथे चितोडगडास पद्मिणि उत्पन्न जाहली. याजवरून हिंदुलोकांवर पेशजी पासोन

---

१. सर रिचर्ड जेंकिन्स—हे नागपुरास रेसिडण्टच्या कामावर होते. यांचा भोंसले घराण्याशीं संबंध कोणत्या प्रकारचा होता ही गोष्ट १६ वा लेख (नागपुरकर भोंसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र) पाहिला असतां समजेल. या साहेबानें राजघराण्याची सर्व माहिती मे० ग्रांट डफ साहेबांकरितां मिळविली होती. यांनीं नागपूरकर भोंसल्यां विषयीं एक लहानसा इतिहास लिहिला आहे. विलकिन्सन साहेब हा कोणी रेसिडेन्टाच्या हाताखालचा अधिकारी असावा असें दिसतें.

२. आलिशा—आलिशान—मोठ्या पदवीचे. हा शब्द पत्रांतून फार करून असतो.

३. जुनी वहिवाट, पूर्व वृत्तान्त.

४. बयाण=हकीकत.

५. प्रस्तुत बखर लिहिणाराचे म्हणजे काशीरावाचे पितृव्य—बळवंतराव गुप्ते.

६. रेसिडेन्टाचे.

७. बळवंतराव गुप्ते यांनीं गंगाधरराव माधव चिटणीस यांच्या सांगीवरून नागपूरकर भोंसल्यांची जी बखर लिहिली; ती प्रस्तुत बखरीच्या कर्त्यानें म्हणजे काशीरावानें पाहिली असावी, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. बळवंतराव यांचे वंशज नागपुरास आहेत.

८. ही पद्मिणीची गोष्ट निराळ्या रीतीनें सांगितलेली आढळते. विविधज्ञानविस्तार पुस्तक ९ पृ० ३० पहा.

अनुक्रमणिका

कोशिस[9] करून होते. तसियांत पद्मिणीची बातमी येतांच चितोडगडावर अकबरशहा यांणीं स्वारी करून लढाई केली. त्या समयीं रजपूत लोकांनीं पादशहाची फौज भारी व जुलमाना होऊं लागला. याजवरून रजपूत लोक वगैरे हिंदू यांणीं शीक लोक आणि तमाम राजेरजवाडे हिंदू एकत्र होऊन अकबराशीं लढाई घेतली. यवनाचा जोर भारी पाहून उदेपूरवाले राणींजी[10] आदिकरून परागंदा जाहले. तथापि फौजबंद सरदार यांजला जेथें जशी जागा मिळाली तेथें त्यांणीं एकमेकांचा आश्रय करून जागोजागीं थाऱ्यास राहिले. त्या हंगामांत भोंसल्यांचें[11] घर व अवांतर कोणी कोणी निघाले व दक्षिणेंत आले. तेव्हां उदरनिर्वाह तो झाला पाहिजे याजकरितां शेत करून रहावें. यावरूनच मौजे हिंगणी पाटस प्रांत हा गांव वैराणींत होता; सबब त्या परगण्याचे हाकिमाकडे[12] जाऊन मौजे मजकूरची वसाहत कबूल करून पाटिलकी वतनी मुंधोजी[13] भोंसले [ यांनीं ] व रूपाजी[14] भोंसल्यांचे पूर्वजांनीं कबूल केली. तेथें उदीम करून होते.

इतक्यांत मालोजी व विठोजी[15] भोंसले यांजपैकीं मालोजी भोंसले यांजला वरप्रसाद झाला कीं, "तुजला पुत्र होईल तो विजयी होईल, त्याचे पोटीं शककर्ता शिवाचा अवतार उत्पन्न होऊन लौकिक विशेषोत्कारें वाढेल, त्याचे हस्तें तुमचे शत्रूंचें पारिपत्य घडेल." याजप्रमाणें [ वरप्रसाद ] होऊन दैववान शहाजी[16] राजे जाहले. यांचे लग्नप्रकरणावरून मालोजी भोंसले, व लुखजी[17] जाधवराव यांत कलह उभा राहून निजाम[18] पातशहा दौलताबादेचा यांजकडे

---

९. प्रयत्न, उद्योग ( लढाईचा ).

१०. राणाजी हा शिवछत्रपतीचा मूळपुरुष. वि० ज्ञा० वि० पु० १ पृ० ३२. पहा.

११. भोंसे किल्याजवळ 'भोंसावत' म्हणून एक गांव आहे, तेथें येऊन राहिले. आणि तेव्हांपासून यांचें नांव भोंसले असें पडलें. भिडेकृत शि० चरित्र पहा.

१२. हाकम–हाकीम=ग्रामाधिपति किंवा नगराधिपति.

१३. हे मागपूरकर भोंसल्याचे मूळ पुरुष.

१४. रूपाजी व परसोजी भोंसले हे पागांचे सरदार असून शिवाजीपाशीं होते. कृष्णाजी अनंत विरचित शिवछत्रपतीचें चरित्र पृ० ८०. पहा.

१५. मालोजी व विठोजी हे सखे भाऊ. मालोजीचा जन्म शके १४७२ व विठोजीचा जन्म १४७५ त झाला.

१६. शाहाजी राजे यांचा जन्म शके १५१६ मध्यें जयनाम संवत्सरीं झाला.

१७. ही गोष्ट निराळ्या प्रकारची आढळते. वि० ज्ञा० वि० पु०१ पृ० ३६,४०पहा. लुखजी जाधवराव शिंदखेडकर हा निजामशाही मनसबदार होता. हा बारा हजार स्वारांचा सरदार असून शिंदखेडचा पाटील होता.

१८. निजाम पातशाहा=अहमदनगरचा पादशाहा. या राज्याची समाप्ति सन १६३७ मध्यें झाली. निजामशाही दरबारचा मुख्य सरदार शहाजी भोंसले हा शाहाजहानास शरण आला, तेव्हां त्यानें अहमदनगरच्या सिंहासनावर बसविलेल्या बाळराजास मोंगलांनीं कैद करून ग्वालेरच्या किल्यावर ठेविलें.

शहाजी राजे गेले. याजवरून पातशहांनीं जाधवराव यांजला पत्र पाठवून आणिले आणि सोयरिकीचा मजकूर करावा म्हणून सांगितलें. त्यांनीं उत्तर केलें कीं, शरीरसंबंध ठरला नाहीं. याजवरून पातशहांनीं म्हटलें कीं, जातीपेक्षां कोणी मोठा नाहीं तेव्हां वाद कोणता? तेव्हां यांणीं उत्तर केलें कीं, आमचे बराबरीचे दौलतदार नाहींत. याजवरून पातशहा कृपावंत होऊन, जहागीर शहाजी राजे यांस देऊन, पुत्र म्हणोन सोयरिकीचा निश्चय लग्नसमारंभ[१९] करविले. व बारा हजार मनुष्य बाहदारींत दाखल करून, कृपावंत होऊन, कुल पुणें प्रांत, जुन्नर व चाकणचा किल्ला, तहद सिरवळ, वाई, सुपें, इंदापूर वगैरे चाळीस लाख होनाचा मुलुख सरंजाम जाहला. सनदा करून दिल्ह्या व पातशाहांनीं आपुले [म्हणविले.] या उपर कांहींएक दिवसांनीं निजामशाहा पातशा शांत[२०] झाले. पातशाहीजादा[२१] मूल लहान, दौलतीचा बयदा, [ असें ] पातशाहाचे स्त्रीनें पाहून शहाजी राजे यांजला आज्ञा केली कीं, " पातशाजादे तुमचे बंधु लहान आहेत. तुम्हीं मुलास तक्तावर बसवून समीप आपण बसत जावें, आणि दौलतीचा राज्यकारभार चालवावा[२२]. " अशी आज्ञा होऊन कांहींएक दिवस चालत असतां, लुखाजी जाधवराव[२३] यांजला वैषम्य वाटून, दिल्लींतून फौज यांचे पारपत्यास बोलाविली. तिकडून दक्षिणेंत सेहा[२४] हजारनिशीं मीरजुमला नामें सरदार येऊन शाहाजी राजे यांस उपद्रव केला. याजवरून राजे मशारनिल्हे यांनीं विजापूरचे पातशाहा सुलतान शिकंदर यांजकडे संधान[२५] करून फौजेसुद्धां जाऊन राहिले. तेथील पातशाहांनीं शाहाजीचें चातुर्य पाहून जहागीर दिली आणि करनाटक[२६] प्रांतीं बंदोबस्तास पाठविलें. तेसमयीं जिजाई[२७] आऊ इजला सहा महिन्याची गरोदर सोडून गेले. ती

---

१९. हा लग्नसमारंभ दौलताबादेस शके १५२६ मध्यें झाला.

२०. मरण पावले.

२१. पादशहास आठ वर्षांचा व सहा वर्षांचा असे दोन मुलगे होते.

२२. ही गोष्ट शके १५४१ मध्यें घडली

२३. लुखजी जाधवराव यवनांस अनुकूल झाला व त्यानें आपल्या मदतीस अलमगीर पादशहाची फौज आणविली. या फौजेचा सरदार मीरजुमला हा होता.

२४. पंचवीस हजार वि० ज्ञा० वि० पु० ९ पृ० ४२ पहा.

२५. शहाजी राजे यानें बाळकृष्णपंत हनुमंते यांच्या मार्फत विजापुरकरांचा दिवाण मुरारपंत जगदेव याजपाशीं संधान लाविलें. शके १५४८ त शहाजी राजे विजापुरकरांकडे आले. निजामशाहीकरितां म्हणजे अहमदनगरच्या पादशाहीसाठीं शहाजी पुष्कळ लढला व निरुपाय होऊन विजापुरकरांच्या चाकरीस राहिला.

२६. कर्नाटकामध्यें कोल्हार, उसकोटा, बाळापूर, सेरा आणि बंगलोर हे प्रांत शाहजीस विजापुरच्या बादशहानें जहागीर दिले होते. भिडेकृत शिवचरित्र पृ० १२ पहा.

२७. शहाजीची बायको व लुखजी जाधवरावाची कन्या. शहाजी व जाधवराव यांचें राजकारणावरून नीट नव्हतें. शहाजीचे दुसऱ्या बायकोचें नांव तुकाबाई आऊ असें होतें.

शिवनेरीस होती. तिजला पुत्र शिवाजी राजे शके १५४९ प्रभवनाम संवत्सरे वैशाख शुद्ध २ गुरुवारीं झाले. शके १५४९ चे सौलीं महा प्रतापी यांचा बयाण जागजागीं लेख व दाखले [ यांमध्यें ] आहेच. पूर्व वृत्तांत शिवाजी महाराजांस मातोश्रींनीं समजाविलाच होता. अलीकडे शिवाजी महाराज यांचे वेळेस अलमगीर पातशाहा अवरंगजेब यांचे बापींनीं आपले लेकीशीं बदनियतेची नजर ठेविली सबब अलमगीर यांनीं त्याचे पारपत्यास जाण्याची तयारी केली, आणि बोलावणें पाठविलें[30] होतें कीं, आमचे इकडे जमावासुद्धां येऊन हाजर होणें. असें पत्र शिवाजी महाराज यांस आलें असतां गेले नाहींत सबब दुशमनीचा सिलसिला अलमगीर यांनीं चालविला. हिंदुस्थानांत फौज दक्षिणेंत जागजागीं तयार करण्यास पाठविले त्यांत राजश्रीचें पारपत्य करून धरून आणावें हा अलमगीराचासंकल्प, व शिवाजी महाराजांचे मनांत दिल्लीवाल्यास जरब बसवावी, असे दोघांचे मनांत दोन प्रकार होते.

पेशजीपासून शिवाजी महाराजांचे समागमें मुधोजी भोंसले व रूपाजी[31] भोंसले हे वडिलोपार्जित सेवा करूनच होते. मुधोजी[32] भोंसले व रूपाजी भोंसले मूळ पुरुष, यांजपैकीं मुधोजी भोंसले यांस पुत्र सातजण पैकीं तपसील.

३ लौकिकवाले—१ बापूजी भोंसले, २ साबाजी भोंसले, ३ परसोजी भोंसले.

४ किताचौघे.*

—

७

रूपाजी[33] भोंसले यांस संतति नाहीं, सबब मुधोजी भोंसले यांचे पुत्र त्रिव-

---

२८. या संबंधानें दुसऱ्या बखरींत उल्लेख आहे तो:—"शुभचिन्हें झालीं. विजापुरीं महाराज यांस शुभशकून जहाले. सहा ग्रह उंच पडले. सर्व लक्षण संपन्न नांव शिवाजी ठेविलें" जिजाबाईनें शिवनेरीच्या शिवाई देवीस नवस केला होता, म्हणून पुत्राचें नांव शिवाजी ठेविलें.

२९. शाहाजहान बादशाहा. शाहजहानाच्या दुराचाराची गोष्ट इतिहासांत आढळत नाहीं. शाहाजहानाची योग्यता अकबरासारखी असतां हा उल्लेख कसा? शहजहानास दोन कन्या होत्या, वडील पादशहा बेगम व धाकटी रोशनारा. पहिलीची सौंदर्याविषयीं ख्याति असे. दुसरी आपल्या भावास म्हणजे औरंगजेबास फार साहाय्य करी.

३०. ही गोष्ट इतर स्थलीं आढळत नाहीं.

३१. रूपाजी व परसोजी शिवाजीपाशीं होते असा लेखाधार अन्यत्रही आढळतो. वि० ज्ञा० वि० पु० ९ पृ० १३२ पहा.

३२. वंशवृक्षावरून मुधोजी व रूपाजी हे भाऊ होत असें समजतें. यांचा आजा परसोजी व बाप बिंबाजी. बिंबाजीस थोरल्या बायकोच्या पोटीं मुधोजी व धाकट्या बायकोच्या उदरीं रूपाजी झाला.

* ह्या चौघांच्या नांवाशिवाय कांहीं माहिती आढळत नाहीं; कान्होजी, दुरगोजी, आवाजी आणि हावाजी अशीं यांचीं नांवें एका वंशवृक्षांत दाखल केलीं आहेत.

३३. वंशवृक्षावरून रूपाजीस संतति होती असें ठरतें.

गांपैकीं वडील बापूजी[34] भोंसले तीर्थरूपांजवळ वृत्तीवर होते. व परसोजी भोंसले व साबाजी भोंसले, हे उभयतां रूपाजी भोंसले यांचे जवळ असतां, साबाजी भोंसले यांजवर पुत्रवत् लोभ केला. व रूपाजी भोंसले याचे पेट्यांत राहून चाकरी करून महाराजांची[35] मर्जी जागजागीं प्रसन्न करून घेतली. याजवरून राजेश्रींनीं कृपाळूपणें आज्ञा केली कीं, " यवनांनीं हिंदु लोकांचा उच्छेद मांडला आहे याजकरितां आपले फौजेशीं व त्याचे फौजेशीं लढाया हमेशा होत आहेत, त्यांत तुम्ही जमियत ठेऊन बरोबर असावें." यास्तव रूपाजी भोंसले यांचे पेट्यांत कांहींएक जमाव ठेऊन बराबर राहिले. तों विजापुरवाले पादशाहा यांजकडील सरदार फाजीलखानें[36] नामें ऐशीं हजार फौजेनिशीं महाराजांवर चालून येऊन पन्हाळ्यांत वेढा घातला. ते वेळेस लढाई मातब्बर जाहाली. शेवटीं पन्हाळ्याहून महाराजांनीं मोर्चे तोडून उधळून दिले. तेव्हां फाजीलखान शिकस्त होऊन गेले. हें वर्तमान दिल्लीचे पादशाहास समजलें कीं, शिवाजी राजे यांनीं मोठा प्रताप करून विजापूरवाले पादशाहाकडील फौजेची शिकस्त* केली. याजवरून अलमगीर पादशाहा यांनीं शास्तीखान[37] नामे सरदार मातब्बर फौज देऊन रवाना केले. त्यांनीं मुलूक मारीत व किल्ले घेत जागजागीं ठाणें बसवून, पुण्यास येऊन राजवाड्यांत राहिले. ते वेळेस महाराज राजगडास होते. तेथें वर्तमान ऐकून कूच करून येऊन शास्ताखानावर छापा घातला. याजमुळें शास्ताखान परागंदा होऊन निघाले. दिल्लीस जात राहिले. तसेंच फौजेसहित महाराजांनीं सुरत अठ्ठाविशी मारली. खजिना माहामूर आणिला. याजवर औरंगाबादेस अलमगीर पादशाहा यांनीं मोहकमसिंग[38] रजपुत दाहा हजार फौजेनिशीं ठेविले होते, त्यांशींही युद्ध फार जाहालें. मोहकमसिंग रजपुत याचा मोड महाराजांनीं केला. अशांत दिलेलखान[39] मनसबदार व मिरजा[40] राजा जयसिंग पातशाहा अलमगीर यांजकडून महाराजांवर फौजेसुद्धां चालून आले होते. त्यांणीं पुरंदरास वेढा घालून महाराजांशीं मिर-

---

३४. (अ) बखरींत बापूजी, परसोजी आणि साबाजी असा अनुक्रम दिला आहे परसोजी बापूजी आणि साबाजी असा अनुक्रमही कोठें कोठें आढळतो.

३५. शिवाजी महाराजांची.

३६. फाजिलखान—हा आफजलखानाचा मुलगा. फाजिलखानाचा पराभव बाजी देशपांडे यांनीं केला. खानाचे ५००० लोक रणीं पाडिले. देशपांडे यांस गोळी लागून मरण आलें. वि० ज्ञा० वि० पु० १ पृ० १२८—२९ पहा.

* शिकस्त=पराभव. (राजव्यवहार कोश. श्लो० १८९.)

३७. शास्ताखानाची हकीकत कृष्णाजी अनंतकृत शिवचरित्रांत पहा. पृष्ठें २७—३०.

३८. मोहकमसिंह असेंही नांव आढळतें.

३९. दिलेलखान हा ८०००० स्वारांनिशीं आला.

४०. कृष्णाजी अनंतकृत शिवचरित्र पृष्ठें ३२—३८ पहा.

अनुक्रमणिका

जाराजे जयसिंग यांनीं दिलेलखान यास न समजतां महाराजांशीं भेटीचा संदर्प लावून तहाचा विचार केला. त्या वेळेस भेटी होऊन २७ किल्ले महाराजांकडून त्यांणीं तहांत घेतले, व बोलण्यांत आणलें कीं, “ तुम्ही पातशाहाचे मुलाजम-[४१]तीस चलावें. अलमगीर पातशाहा, तुम्हास सर्फराजि[४२] करतील. ” हें ऐकून महाराजांनीं संशय मानिला. तेव्हां मिरजाराजा जयसिंग यांनीं दगा होणार नाहीं म्हणून इमानप्रमाण केलें. याजवरून महाराजांनीं आपल्या प्रांतांचा बंदोबस्त करून, सरदार लोक प्रांतांत ठेवून, आपण चिरंजीव संभाजी[४३] राजे या समवेत थोडकेसे जमियतीनिशीं[४४] दिल्लीस चालले. ते वेळेस मिरजाराजे जयसिंग यांनीं आपले तर्फेनें रामसिंग[४५] समागमें देऊन महाराजांस रवाना केलें. हे पातशहाजवळ जाऊन पोंहचल्यावर भेटीचे वेळेस सलामावरून पातशाहाचे मनांत [४६]विक्षेप आला. याजकरितां नजरबंद करून कैद दाखल ठेविले. महाराजांसाहित जमावा भोंवते पातशाही फौजेच्या चौक्या[४७] बसल्या. तेव्हां हिंदु लोकांस अंदेशा आला कीं इमान देऊन आणलें असतां असें केलें, हें नीट नाहीं. तेव्हां जयनगरवाले यांनीं पातशहास अर्ज केला जे, “ महाराजांनीं कोंकण प्रांतींचे जिन्नस मेवामिठाई आणिली आहे, हुकूम जाहल्यास येथील उमरावजादे यांचे येथें पाठविण्यांत येईल. ” असें बोलले असतां “ फार चांगलें ” म्हणून आज्ञा जाहली. हें वर्तमान महाराजांस सांगितलें, तेव्हां दर रोज मेवामि-ठाईचे[४८] पेटारें भरून अमीरउमराव यांचे येथें हमेशा पाठवीत असावें. असें होत असतां एके दिवशीं त्या पेटाऱ्यांत पितापुत्र उभयतांही बसून वेष पालटून निघून ते मथुरेस[४९] येऊन चिरंजिवांस ब्राम्हणाचे घरीं गुप्तवेषें

४१. मुलाजमत=भेट, मुलाकत.

४२. थोर पदीं आरूढ.

४३. संभाजीशिवाय मोठमोठी मंडळी शिवाजीबरोबर गेली होती. त्यांचीं नांवें पूर्वोक्त शिवछत्रपतीच्या चरित्रांत दिलीं आहेत. पृष्ठ ३९ पहा.

४४. फौजसह.

४५. मिरजा राजे जयसिंग याचा मुलगा.

४६. या प्रसंगाचें वर्णन कृ० अ० कृत शि० चरित्रांत आहे. पृ० ३९–४० पहा.

४७. पोलादखान कोतवाल शिवाजीच्या डेऱ्या भोंवती चौकी देऊन ५००० स्वारांनिशीं उभा रहात असे.

४८. मजुरांच्या डोक्यावर पेटारे देऊन मेवामिठाई पाठवीत असे.

४९. ‘ कृ० अ० कृत शि० चरित्र ’ पृ० ४२–४५ पहा.

५०. “ संभाजी राजे लहान त्यांचा पायीं निभाव पडणार नाहीं, म्हणून मथुरेंत काशीपंत पेशवे यांचे आप्त विश्वासु रोजगारी तथें होते त्यांचे जवळ उपाध्ये यांचे विचारें ठेवून आम्ही आमके मार्गें जाणार तें समजूं न देतां ‘ आम्ही अमुक स्थळीं आल्यावर सांगून पाठवून त्यांस घेऊन जाऊं. ’ असें सांगून ब्राह्मणाचा वेश संभाजी राजे ह्यांस देऊन गुप्तपणें ठेविलें. समागमें विसाजीपंत व चोबे उपाध्ये यांस घेतलें. आपण सर्व मंडळीसह बैरागी वेष धारण

(पुढें चालू.)

अनुक्रमणिका

## पंत प्रधान पेशवे यांच्या साल-वार कारकीर्दी.*

कारकीर्द **बाळाजी विश्वनाथ** पंत **प्रधान** यांस वस्त्रें [ झालीं ] शके १६३५ जयनाम संवत्सरे सुरुसन आर्बा अशर मया† तैन व अल्लफ. सनें ११२३ माघ मास. **शाहू** महाराज छत्रपति **दिल्लीहून** सुटून येऊन किल्ले **सातारा** येथें येऊन अष्टप्रधान पदें देऊन आरंभ केला. ते समयीं **श्रीमंत बाळाजी विश्वनाथ** यांस पंतप्रधान [नेमून] यांचे दिवाण **आबाजी** पंत **पुरंदरे** मुजुमदार व चिटणीस हुजूरचे नेमिले. हुजूरची मुतालिकी **पुरंदरे** यांस देऊन वस्त्रें सर्वांस दिलीं. **बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान** शिक्का झाला. **पुणें** देशींचा सुभा दिला. तेव्हां **पुण्यांत** अम्मल शके १६२९ एकूणतिसांत **निजाम मुलुखे** यांचा. ते **औरंगजेब** पातशहा शांत झाल्यावर **दिल्लीहून बहादरशहा** पातशहा पासून सहा सुभे दक्षिणेची सुभेदारी करून आले. त्यांणीं **पुणें** वगैरे जहागीर **रंभाजी निंबाळकर** यांस दिली होती. त्यांजकडून कसबे मजकुरीं **बाजीकदम फौजदार** व **गुंडाजी** नाईक **शेकदार**‡ अमलावर होते. तों शके मजकुरीं **पंत प्रधानांकडील त्र्यंबकोजी ढमढेरे पुण्यास** चौथाई अमलावर आले. दोन अंमल चालू

---

* देलवडी, ता० **भिमथडी** जि० **पुणें** येथील इनामदार **विठ्ठलपंत पुणेकर** यांच्या घरीं **पेशव्यांच्या** सालवार हकीगती २ सांपडल्या, त्या रा० **शंकर तुकाराम शालिग्राम** यांणीं आम्हांकडे दिल्या. त्यापैकीं एक अवल पासून **सवाई माधवराव** यांच्या अखेरी पर्यंत आहे. ही जुन्नरी कागदाच्या चिकट बंदावर लिहिलेली आहे. हिचें वरचें पान नाहींसें झालें आहे. राहिलेल्या तुकड्यावरून त्यावर पेशव्यांची वंशावळ होती असें दिसतें. हींत दिलेली हकीगत पुष्कळ पाल्हाळ नसतां चांगली तपशीलवार लिहिलेली आहे. दुसरीमध्य नुसतें मुसलमानी साल देऊन एखादी दुसरी झालेली मुख्य गोष्ट इतकेंच कायती दिली आहे, पण ही अव्वली पासून पेशव्यांचे अखेरी पर्यंत आहे. यांतील पहिली येथें छापण्यास आरंभ करितों. दुसरींत जेथें फरक दृष्टीस पडेल तितका मात्र देत जाऊं म्हणजे पुरे.

† अर्बा अशर मया व अल्लफ=१११४ मूळांत 'मयातैन' असें आहे तें चूकीचें आहे. ही चूक पुढील कलमांतही दृष्टीस पडते.

१ सन ११२३ हा सन फसली असें येथें व पुढें ही समजावें.

२. निजाम उल्मुल्क असफजहा हे दक्षिणेच्या सुभ्यावर प्रथम १७१३ सालीं आले. पुन: परत दिल्लीस गेल्यावर त्यांस तोच सुभा १७२२ च्या सुमारास झाला. मध्यंतरीं सुभा सय्यद हुसेन यांजकडे होता.

‡ शेखदार=थोडे गांवांवर अधिकार ज्याचा असा कामगार; तरफदार असेंही यास म्हणतात.

अनुक्रमणिका

लागले. श्रीमंत सातारियाहून वस्त्रे घेऊन सासवडास † येऊन राहिले. अखेर साल झालें. मुलूख वैराण. पुण्यांत वस्ती जुजबी होती. पातशहाचा अंमल उठला. सदरहु अंमल झाला असे.

१. शके १६३६ विजयनाम संवत्सरे सु॥ खम्मस अशर मय्यातैन § व अल्लफ. सन ११२४--स्वारी पुणे देशीं फिरली. मुलुख वैराण. बरावर आबाजीपंत ‡ पुरंदरे———कलम १.

१. शके १६३७ मन्मथनाम संवत्सरे सन ११२५ स्वारी करून पुरंदर येथें अंमल केला. पुरंदरे यांणीं अंमल बसवून सासवडीं राहिले. कलम—१.

१. शके १६३८ दुर्मुखनाम संवत्सरे सन ११२६—-स्वारीस निघोन कुटुंब बरावर असतां मुळानदीवर गेले. तेथें मौजे हिंगणगांव ता॥ सांडस येथें दमाजी थोरात पुंड होता. त्याणें भेटीस म्हणून बलावून घेऊन कुटुंबासह कारभारी आबाजीपंत पुरंदरे यांस अटक करून बाळाजीपंतांवर निकर्ष करूं लागले. तेव्हां आबाजीपंतानें निकर्ष सोसून खंडाचें बोलणें केलें. द्रव्य द्यावयास नाहीं, सबब सौभाग्यवती मातोश्री राधाबाई व पुत्र बाजीराव व चिमाजी आपा तेथें ठेवून खासे निघाले. तेथें मोरशेट करंज्या होता तो लाह्यांचे लाडू करून देत होता. सबब त्याचें व त्याचे पुत्र घनशेट करंज्ये यांचें सरकारांतून चालविलें. कान्होजी आंग्रा दिवट्या महाराजांपाशीं होता त्यास कोंकणचे किल्ले सांगितले—कलम—१

१. शके १६३९ हेमलंबीनाम संवत्सरे सन ११२७——निजामनमुलुकास दिल्लीहून हुकूम आला यामुळें तो दिल्लीस जावयास निघाला. त्यास श्रीमंत व आबाजीपंत पुरंदरे भेटून भाईचार केला. त्यानें फौजेचे शिरस्ते प-

---

† सासवडास पेशव्यांचा जुना वाडा ३ चौकांचा होता. थोडे दिवसांपूर्वी मागील दोन चौक पाडिले. पुढील चौकांत सरकारी मराठी शाळा आहे. नवा वाडा नदीच्या पलीकडे गांवाबाहेर आहे तो पुढें बांधिला. या नव्या वाड्यांत हल्लीं फेरफार करून मामलेदार कचेरी घातली आहे.

§ खम्मस वगैरे—११५. पृ. १ टी.† पहा.

‡ "आबाजीपंत" असें आतां जिकडे तिकडे दृष्टीस पडतें. यांचें नांव 'अंबाजीपंत' असें आहे. मूळ कागद आज आम्हांपाशीं नाहींत याजमुळें त्यांत काय आहे तें पहातां येत नाहीं. पुढेंही 'आबाजीपंत' असेंच येत जाईल. आम्ही मूळ कागदाची प्रत करून घेतल्यास ५ वर्षांवर दिवस होऊन गेले.

३. निकर्ष=हाल, यातना. कैद करून राखेचे तोबरे देणें, चाप लावणें वगैरे प्रकार.

४. अंबाजीपंत व मोरशेट करंज्ये याची वतणूक ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. हल्लीं करंज्ये हे कोठे आहेत?

५. कोणत्या? शिवाजीपाशीं असावा.

६. दक्षिणेचा सुभेदार या वेळीं सय्यद हुसेनखान हा होता. त्यासच येथें निजाम उल्मल्क म्हटलें आहे—मागें टीप २ पहा.

माणें रोजमुरा करार करून बारा हजार फौजेनिशीं बराबर दिल्लीस नेलें. तेव्हां रामाजीपंत व बाळाजीपंत नाना भानु[7] बराबर होते.

१. शके १६४० विलंबीनाम संवत्सरे सन ११२८. निजाममुलकानें बाळाजीपंताचा व आबाजीपंताचा बडिवार पातशहापाशीं करून मेजवानी व द्रव्य देववून आपल्या बराबर देशीं घेऊन आले. खंडाचा पैका दमाजी थोरात याचा देऊन मांतोश्री[9] राधाबाई व पुत्र बाजीराव, चिमाजीआप्पा सोडवून घेतलें[10]. आणि नबाबाची व आपली फौज मिळवून हिंगणगांवास वेढा घालून दमाजी थोरात धरून पुरंदरावर कैदेंत ठेविला. हिंगणगांवची गढी पाडून, चिरे मुळानदींत टाकून, गाढवांचा[11] नांगर फिरविला. मुलकास लावणीचा कौल देऊन राजदर्शनास साताऱ्यास गेले. मोंगलांकडील अम्मल पुण्यांतील उठविला. या सालीं पुणे येथें वस्ती आहे. हरी यादव[12] सुभेदारीवर आहेत. दिल्लीचे स्वारींत बाळाजीपंत भानु[13] फडणीस शांत झाले, फडणिशीवर अंताजीपंत[13] असत—कलम.

१. शके १६४१ विकारीनाम संवत्सरे सन ११२९. श्रीमंत व आबाजीपंत पुरंदरे साताऱ्यास असतां महालांतून राण्यांकडून आग्रह दमाजी थोरात सोडावयाचा झाला. त्यामुळें राजश्रींचे आज्ञेवर दमाजी थोरात सोडिला. निरोप घेऊन पुणें प्रांतीं आले. पुण्यांतील मोंगलाचा ठाणेदार उठून गेला. एक अम्मल प्रधान यांचा झाला. आश्वीन मासीं बाळाजीपंत नानांचा काळ झाला. पुत्र बाजीराव व चिमाजी आप्पा व स्त्री राधाबाई होती. कारभारी आबाजी पंत पुरंदरे यांनीं सार्थक केलें. शिक्का इस्तकबिल कार्तीक तागाईत फाल्गुन श्रीमंतांचा काळ झाल्यावर शिक्का त्याच नांवाचा चालवीत होते.—कलम

कारकीर्द श्रीमंत बाजीराव बल्लाळ प्रधान.

१. शके १६४२ शार्वरीनाम संवत्सरे सन ११३०. छ २० जमादिलाखर महाराज शाहू राजे [यांणीं] साताऱ्यास बाजीराव साहेब यांस वस्त्रें दिलीं व दिवाणगिरीचीं व हुजूरचे मुतालकीचीं वस्त्रें आबाजीपंत पुरंदरे यांस दिलीं. बाजीराव बल्लाळ प्रधान शिक्का झाला. राजेश्रींचा निरोप घेऊन पुणें देशीं आले. रयतेस कौल सन ११२८ त दिले होते त्याप्रमाणें चालविले. ते सालीं श्रीमंतांस पुत्र नानासाहेब झाले———कलम.

---

७. भानु—हे नाना फडणवीस यांचे पूर्वज—यांजकडे फडणिशी होती—पेशव्यांची बखर पृ० ११।१२।१३ पहा.

८. वर टीप ६ पहा.

९. 'मातुःश्री' असें बखर लिहिणारानें सन्मानार्थ लिहिलें आहे. ही बाळाजीपंताची स्त्री.

१०. वर वर्ष ११३८ पहा.

११. गाढवाचा नांगर फिरविणें हें ओसाड करून टाकण्याचें चिन्ह आहे.

१२. हे हरी यादव कोण ?

१३. पेशव्यांची बखर पृ० १७।१८ पहा.

अनुक्रमणिका

१. शके १६४३ प्लवनाम संवत्सरे सन ११३१. उदमी लोकांस पेठेचे कौल देऊन आमदानी करविली. कारभारास संभाजी जाधव[14] ठेविले. स्वारीस निघाले. बराबर आबाजीपंत पुरंदरे. लोकांस नालबंदी देऊन फौज तयार करून ब्रम्हपुरी[?] पर्यंत गेले. तेथें भडबुंज्या जती सरंजाम सुद्धां होता त्याशीं लढाई करून लुटून घेऊन देशीं साताऱ्यास जाऊन राजदर्शन घेऊन पुण्यास आले.[15]——कलम.

१. शके १६४४ शुभकृतनाम संवत्सरे सन ११३२. श्रीमंत फौजेसुद्धां कारभारी आबाजी पुरंदरे बरोबर घेऊन स्वारीस निघाले. तों गाजुद्दीखान पठाण चालून आला. त्याचा पराभव करून साताऱ्यास राजदर्शन घेऊन पुण्यास आले—कलम १.

१. शके १६४५ शोभननाम संवत्सरे सन ११३३. स्वारी हिंदुस्थानाकडे चालली. तों सय्यदखान मोठी फौज घेऊन चालून आला. त्याशीं लढाई देऊन, लुटून, देशीं येऊन राजश्रींस भेटले. या संवत्सरीं रघुनाथराव पुत्र झाले. कोंकणांत बावडे-करांपासून कान्होजी आंग्रे याणीं सुवर्णदुर्ग घेतला. ——कलम.

१. शके १६४६ क्रोधीनाम संवत्सरे सन ११३४. स्वारी निघाली तों दाउदखान चालून आला. त्याशीं लढाई देऊन, पराभव करून, राजदर्शन घेऊन छ १ जिल्काद ऊर्फ श्रावणमासीं पुण्यांत आले. कारभारी आबाजी[16] पुरंदरे. ——कलम.

१. शके १६४७ विश्वावसुनाम संवत्सरे सन ११३५. स्वारी फौजेस नालबंदी देऊन निघाली. कारभारी आबाजी पुरंदरे, फडणीस अंताजीपंत, व आया मुजुमदार, व आवजी परभु चिटणीस, व बापूजीपंत पोतनीस वगैरे मुत्सद्दी बरोबर घेऊन दिल्लीस[17] गेले.——कलम.

१. शके १६४८ पराभवनाम संवत्सरे सन ११३६. स्वारी दिल्लीहून माघारी येऊन राजश्रींची भेट घेऊन पुण्यास माघारी आली.——कलम.

१. शके १६४९ सन ११३७ स्वारी साताऱ्यास गेली. जनार्दन बाबा पुत्र झाले. देशीं स्वारी करून आले. कोंकणांत, संभाजी आंग्रे सुवर्णदुर्गास; कुलाब्यास मानाजी आंग्रे.——कलम.

---

१४. संभाजी जाधव हे कोण ? जाधवाच्या वाडीचे ?

१५. दुसऱ्या बखरींत "सन इसन्ने अशरीन स्वारी ब्ऱ्हाणपूर भडबुंज्यांचें पारपत्य" असें आहे.

१६. "स्वारी मोंगलावर दाउदखान याचें पारिपत्य" दुसरी बखर.

१७. 'दिल्लीस' म्हणजे खानदेश माळवा इकडे इतकेंच येथें समजलें पाहिजे.

१. शके १६५० सन ११२८. स्वारी निघाली तों दमाजी थोरात याणें बंड केलें. त्याजवर चालून जाऊन लुटून घेऊन, धरून पुरंदर किल्यावर कैदेंत ठेविला. तो तेथें मृत्यु पावला. स्वारी देशीं हिंडून राजदर्शन घेऊन पुण्यास आली.———कलम.

१. शके १६५१ सन ११२९. नाना साहेब यांचें लग्न भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या सौभाग्यवती गोपिकाबाई वधू निश्चय करून माघमासीं केलें. कसबे पुणे येथें पश्चिमेस भेंड्यांचे आवाराचें कुसूं होतें. त्याचे आंत कोष्टी राहत होते. त्यांस जागा मंगळवार पेठेंत देऊन, ती जागा मोजून, पांच बिघे घेऊन वाडा बांधावयास काम लाविलें. स्वारी देशीं करून पुण्यास आले. कलम.

१. शके १६५२ सन ११४० छ ७ जिलकाद स्वारी उंबरजेची करून राजदर्शन घेऊन छ १८ जिलकादीं पुण्यास आली. कारभारी आबाजी पुरंदरे. ———कलम.

१. छ ८ रा।। आश्वीनमासीं डेरे संगमावर देऊन स्वारीस निघाले. फौजेस नालबंदी देऊन पागा व सरदार आवजी कवडे, कारभारी आबाजीपंत पुरंदरे, रघुनाथजी परभु व आया मुजुमदार व फडणीस वगैरे मुत्सद्दी सरंजाम ३०।३५ हजार फौजेनिशीं गुजराथ प्रांतीं गेले. तेथें त्रिंबकराव दाभाडे सेनापति चालून आले. आवजी कवडे यांस लुटलें. तेव्हां सर्वत्र बसून, विचार करून, चालून गेले. दाभाडे यांजजवळ पन्नास हजार फौज. हत्तीस अंदुक जोडून, लढाईस उभे राहून, तिरंदाजी खांसे करितां करितां अकल्पित गोळी लागून ठार झाला. फौज मोडली. श्रावणमासीं गुजराथचा कारभारे झाला. दाभाडे श्रावणमासीं ब्राम्हणांस देकार देत होते त्या देकाराची चाल पुण्यांत घातली. खबुत्रखान्यांत देकार चालता झाला.———कलम.

१. शके १६५३ सन ११४१. स्वारी गुजराथ करून देशीं आली. छ ३ जिल्हेजीं राजदर्शनास जाऊन छ १९ जमादिलाखरीं, मार्गशीर्ष मासीं पुण्यास आली. छ १० साबान माघमासीं कोंकणांत स्वारीस निघाले. कल्याणास जाऊन, कुलाब्यावरून पुण्यास आले. छ ९ रमजान, फाल्गुनमास. कारभारी आबाजी पुरंदरे. वाड्याचें काम चाललेंच आहे.———कलम.

१. शके १६५४ सन ११४२. स्वारी निघून निजाम मुलूख याची भेट घेऊन जयपूर प्रांतीं गेले. राणोजी शिंदे यांस पागा दिली. मल्हारजी होळकर चाकरीस ठेऊन मुलकांत खंडणी घेऊन, देशीं येऊन राजदर्शनास छ १६ न-

१८. अंदुक जोडून=ठाम करून.

१९. गुजराथचा कारभार झाला=गुजराथेचा सुभा पेशव्यास दिला ?

मादिलाखरीं गेले. छ १७ रमजानीं पुण्यास दाखल झाले. घरीं बाळाजी बाजीराव होते. त्यांणीं रघुनाथराव यांचा व्रतबंध केला.——कलम.

१. शके १६५५ सन ११३३. वाड्याचें काम चालत आहे. श्रीमंत चिमणाजी आप्पा यांस राजेश्रींकडे छ ११ जमादिलावल आश्विनमाशीं रवाना करून, बराबर पिलाजी जाधव यांस देऊन मुलुकगिरीस रवाना केलें. आप्पा यांस पुत्र सदाशिवपंत भाऊ झाले.—— कलम.

१. शके १६५६ सन ११३४. स्वारी छ १६ रबिलावलीं निघोन सातान्यास गेली. तेथून आबाजीपंत पुरंदरे यांनीं मुतालकीवर हुजूर दादोपंत यांस ठेविलें. आपण निघोन काशीस गेले. पिलाजी जाधव यांस बालेघांटीं छ १ रज्जबीं रवाना केलें. त्यांनीं स्वारी वऱ्हाडापर्यंत करून छ २४ मोहोरमीं आले. श्रीमंत चिमाजी आप्पा छ १६ साबानीं पुण्यास दाखल झाले. वाड्याचें काम तयार व्हावयास आलें.—— कलम.

१. शके १६५७, सन ११४५. श्रीमंत व चिमाजी आप्पा स्वारीस अजमीरपर्यंत गेले. तेथें आबाजीपंत पुरंदरे काशीहून येऊन भेटले. स्वारी करून देशीं आले. तों आबाजीपंतांचा काळ झाला. त्यास पुत्र महादाजी आबाजी होते. कारभार चिमाजी आप्पा करूं लागले. छ ६ जमादिलाखर कार्तीक माशीं कुलाब्याकडे स्वारी कोंकणांत करून छ २० मोहोरमीं राजदर्शन करून पुण्यास आले. वाड्याचें काम तयार झालें.—— कलम.

१. शके १६५८ सन ११४६ वाड्याची वास्तु करून वाड्यांत नांदूं लागले. मस्तानी कळावंतीण खासगीस होती. तीस जागा वाड्यांत करून ठेविली. स्वारीस भा ड ब दा व र [?] दतिया, वोडसें, यमुनास्थान, हिंदुस्थान प्रांतीं करून छ २४ सफरी पुण्यास आले. नंतर साष्टीस जाऊन, अम्मल बसवून, छ १३ रबिलावलीं आषाढ मासीं पुण्यास आले.—— कलम.

१. शके १६५९, सन ११४७. स्वारी हिंदुस्थान. निजामनअल्ली नबाब यमुना पार होऊन बुंदेल खंडांत आले. बुंदेले व दतिया, वोडसें, ग्वालेर, चंदेरी, सो द र क र [?] व रोहिले, व सवाई जयसिंग यांचे पुत्र सैंमील[२०] झाले. नबाब माळव्यांत येऊन पोहोंचले. सरकार फौजेचा मोकाबला[२१] होतांच नबाब भुपाळाजवळ किल्याचे आश्रयानें जाऊन लढाई करूं लागले. छ ३ रमजानापासून छ २६ पर्यंत तोफांचे बळें फौज राखून राहिले. सरकार फौजेनें रसैत[२२] मना केली. सारें अन्न झालें तेव्हां स्नेहाचें बोलणें लावून दीड दीड कोशाचे

२०. सामील निजाम उल्मुल्क यास झाले.

२१. मुकाबला=गांठ, लढाई.

२२. रस्त=दाणावैरण यांचा पुरवठा.

कूच क [ रून ] [23]दुराईकडे येऊन सल्ला करून माळवा दरोबस्त दिला. सनदा पातशहापासून करून देतों म्हणून करार केला. हिंदु राजे श्रीमंतांस येऊन भेटले. नबाब दिल्लीस गेले. [24]चंमेली आलीकडील मुलकाचा पैका घेत जावा असें कबूल केलें. श्रीमंत चिमाजी आप्पा देशीं फौज बाळगून होते. तों कोंकणांत वसई प्रांतीं इंग्रेजे[25] यांनीं अशेरीचा मोर्चा उठविला हें वर्तमान आलें. त्याजवरून [26]हरजी ताकपीर यांस लोक घेऊन जावयास सांगितलें. संभाजी शिंदे हजार स्वारांनिशीं रवाना करून खासा दरमजल कोंकणांत गेले. सातान्यास राजेश्री जवळ बाळाजी बाजीराव व महादाजी आबाजी पुरंदरे ठेविले होते. श्रीमंत देशीं हिंदुस्थानांतून येऊन राजदर्शन घेऊन अखेरीस पुण्यास आले. जंजिरियाची मसलत चालली.———कलम.

१. शके १६६० सन ११४८. जंजिऱ्याचे मसलतीस फौज राजेश्रींची[27] मदतीस आली. तह करून राजेश्रींस भेटून पुण्यास आले.———कलम.

१. शके १६६१ सन ११४९. स्वारी वसईची, चिमणाजी आप्पा कोंकणांत असतां वैशाख वद्य द्वितीया मंदवारीं दोन प्रहरा दिवसा वसईवर निशाण शाहू महाराज यांचें चढविलें. फत्ते झाली. पुण्यास आले. श्रीमंत विषयास लंपट झाले. याजमुळें चिमाजी आप्पाशीं अंतर[28] पडून निघून नर्मदा तीरास गेले. महादजी आबाजी पुरंदरे बडोद्यास पाठविले होते ते व चिमाजी आप्पा व नाना साहेब राजेश्रीं जवळ गेले.———कलम.

१. शके १६६२ सन ११५०. बाजीराव बल्लाळ प्रधान यांचा काळ नर्मदातीरीं झाला. चिमाजी आप्पा वसईस. नानासाहेब सातोऱ्यास[29]. सुवर्णदुर्ग विजयदुर्ग येथें अम्मल तुळाजी आंग्रे. कुलाब्यास मानाजी आंग्रे.—कलम.

कारकीर्द श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब.

१. शके १६६२ सन ११५०. वैशाखमाशीं बाजीराव शांत झाल्यावर त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव व रघुनाथराव व जनार्दन बाबा व चिमाजी आप्पा व त्यांचे पुत्र भाऊसाहेब होते.———कलम.

---

२३. दुराई सुराई–सिरोंजेच्या लगत आहे.

२४. जिला हल्लीं चंबला म्हणतात ती.

२५. ‘ इंग्रज ’ यांच्या बद्दल फिरंगी ( पोर्तुगीज ) असें पाहिजेसें वाटतें. अशेरी केळवे माहिमाजवळ आहे.

२६. हे कोण ?

२७. शाहूकडून प्रतिनिधी व फत्तेसिंग भोंसले आले त्यांस उद्देशून हें लिहिणें असावें.

२८. अंतर कसें पडलें तें स्पष्ट होत नाहीं. यावरून दोघाभावांत कलहाग्नि पेटावयास आरंभ जाला होता असा संशय चांगला येतो.

२९. आपा व नाना असे उभयतां या वेळीं कुलाब्याजवळ स्वारीस होते असें अन्यत्र दाखले सांपडतात.

१. शके मजकूर साताऱ्यास राजश्रींजवळ बाळाजी बाजीराव दोन अडीच वर्षें अगोदरच जाऊन [ येऊन ? ] होते. तों प्रधानपंत नर्मदातीरीं कैलासवासी झाले. तेव्हां रघूजी भोंसले याणीं बाबूजी नाईक बारामतीकर यांस पेशवाई द्यावयाचें बोलणें लाविलें. तेव्हां महादाजी आबाजी पुरंदरे, गोविंदराव चिटणीस यांचे विद्यमानें बोलले. तेव्हां राजश्रींनीं बाळाजी बाजीराव यांस [ पेशवाईचीं ] वस्त्रें व पुरंदरे यांस हुजूरचे मुतालकीचीं व दिवाणगेरीचीं वस्त्र दिलीं. निरोप घेऊन पुण्यास आले. बाबूजी नाईक बारामतीकर यांचें देणें होतें. त्यांनीं ऐवजाकारितां तगादा बसविला. त्याचा निकाल पुरंदरे यांणीं केला. छ ९ रमजानीं, मार्गशीर्ष माशीं, श्रीमंत व कारभारी महादाजी आबाजी स्वारीस निघाले. बरोबर सौभाग्यवती गोपिकाबाई व भाऊसाहेब होते. छ ८ सवाल, पौषमाशीं चिमाजी आप्पांचा काळ झाला. स्वारी हिंदुस्थानांत. राजे भोंसले वगैरे खंडणी घेऊन यश संपादून पुण्यास दाखल झाले. त्या समयीं सदाशिव चिमणाजी भाऊसाहेब उमर वर्षें सात, रघुनाथराव दादा उमर वर्षें पंधरा[30], जनोबा बाबा उमर वर्षे तेरा. कारकीर्द इस्तकाबिल श्रावण तागाईत फाल्गुन.—

१. शके १६६३, सन ११५१. स्वारी सुरंदभेलशाची व भूपाळची करून आली. यावर छ १३ जमादिलावल अधीक श्रावणमाशीं श्रीमंत भाऊसाहेब बारा हजार फौज घेऊन राजदर्शनास गेले. भाद्रपदमासपर्यंत साताऱ्यास होते. श्रीमंतांबराबर भाऊसाहेब व सौभाग्यवती गोपिकाबाई. [ त्यांस ] घेऊन छ १७ रमजान ऊर्फ कार्तिकमाशीं निघाले ते बेलापूर पर्यंत गेले. गोपिकाबाई गरोदर होती. त्यांस व भाऊसाहेब यांस माघारे छ २२ जिलकादीं पुण्यास लाविलें. खांसा स्वारी हिंदुस्थानांत गेले. धारेस मांर्चे लाऊन घेऊन गढेमंडळास मोर्चे लाऊन छावणी केली. देशीं वाड्यांत तिघे खासे होते.[31]———कलम.

१. शके १६६४ सन ११५२ गढेमंडळ घेऊन, बंगाला व प्रयाग करून रघोजी भोंसले चालून आले त्यांस लुटून घेऊन, फौजेची दोन वर्षांचे नालबंदीची समजूत करून उमेदवार कारकून चारशें बराबर होते, त्याच्या तैनाता करून दिल्या. अखेरीस घरीं आले. वाड्यांत भाऊ साहेब व रघुनाथराव व जनोबा बाबा होते ते गंगास्नानास त्रिंबकीं जाऊन आले. सौभाग्यवती गोपिकाबाई गरोदर होती त्यांस विश्वासराव पुत्र झाले.—कलम.

३०. रघुनाथराव शके १६४५ वर्षी जन्मले असें वर आलें आहे तेव्हां ते या सालीं १७ वर्षांचे असावें.

३१. "हिंदुस्थानांत गढेमंडळ येथील खंडणी करून मकसुदाबादेहून भागीरथी स्नान होऊन सनसल्लास अबैनांत अखेरीस आले." दुसरी बखर. पेशव्यांची बखर पृ॰ ७३ पहा.

कपी कोपले गर्जती युद्ध-काळीं । शिळा टाकिती पाडिती दुर्ग-पौळी ॥
गिरी हाणिती थोर नेटें धडाडी । बळें लागतां दिव्य लंका घडाडी ॥ ३४ ॥
त्रिकूटाचळीं लोटली सर्व सेना । असंभाव्य ते भार लंका दिसेना ॥
कपी क्षोभले गर्जती काळ जैसे । दळेंशीं बळें धांवती वीर तैसे ॥ ३५ ॥
दळें पार्थिचीं थोर[h] अश्वा गजांचीं । रणीं चालिलीं दाट थाटें रथांचीं ॥
बहू भार शृंगारिले राक्षसांचे । महा वीर ते घोर नाना परीचे ॥ ३६ ॥
रणीं पातली ते [i]भयातूर सेना । रजें मातली चंद्र-सूर्यो दिसेना ॥
बहूसाल वाद्यें बहूतां परीचीं । महा कर्कशें वाजती राक्षसांचीं ॥ ३७ ॥
समारंगणीं चालिल राजभारें । दळें दाटलीं वानरांचीं अपारें ॥
बळें हाणिती येकमेकां धबाबां । झरे लागले शोणितांचे[23] थबाबां ॥ ३८ ॥
पुढें धांविले पार्थिचे शस्त्रधारी । जयां देखतां रोमें[24] आंगीं थरारी ॥
कपी राक्षसांतें महा मार जाला । तेणें शोणिताचा नदी पूर आला ॥ ३९ ॥
रणीं तोडिती वीर वीरां धसासां । भगाडें बहू पाडिती ते घसासां ॥
बळें टोंचिती शूळ पोटीं भसासां । शिरें फोडिती मुष्टि–घातें ठसासां ॥ ४० ॥
पुढें झुंझतां भार तो मृत्यु पावे । करीती बळें वीर मागें उठावे ॥
कपी कोपले थोर काळाग्नि जाले । रिपू पार्थिचे सर्व ही भस्म केले ॥ ४१ ॥
निमाले रणीं देह त्या पार्थिच्यांचे । बळें ऊठले भार त्या रौंउतांचे[25] ॥
देह टाकिती झुंझती स्वामि-काजा । पुढें धांवती वीर मागील फौजा ॥ ४२ ॥
कपी झुंझतां भंगल्या अश्व-याती । रणीं लोटलीया बळें भद्रजाती[26] ॥
गिरी सारिखे थोर कीलकोट घोषें । गजीं वानरां त्रासिलें हो विशेषें ॥ ४३ ॥
कपीराज ते हाणिती मत्त हस्तें । बळें झोडिती कुंजरें[27] खस्त व्यस्तें ॥
दळें पार्थिचीं अश्व–रत्नें अपारें । रणीं पाडिलीं कुंजरें थोर थोरें ॥ ४४ ॥
कळेना महा मार त्या वानरांचा । रथीं[j] थोर संहार केला गजांचा ॥
तया पृष्ठिभागीं पुन्हा भार आले । रिपू वनारीं सर्व संहार केले ॥ ४५ ॥
पुढें चालिले भार नाना रथांचे । बहू बाण जाळें कपी-सैन्य खोंचे ॥
रणीं धांवती चक्र चाली घडाडां । [k]करीं टाकिती चंडशीळा धडाडां ॥ ४६ ॥
रथी सारथी सर्व ही चूर्ण केले । महा वीर ते [l]भार मागूनि आले ॥
रणीं राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला । जयो वानरां शीघ्र टाकून आला ॥ ४७ ॥
रणीं मारुतें पाडिला जंबुमाळी । सुखेणें विदूणा पुढें ते चि काळीं ॥

---

h. 'अश्वरत्नें' पा॰ भे॰. i. 'भयासूर' पा॰ भे॰. २३ शोणित=रक्त. २४ रोम=केश, लोम, कांटा. २५. राउत=घोडेस्वार. २६ भद्रजाती=हत्ती. २७ कुंजर=हत्ती.
j. 'रणीं' पा॰ भे॰. k. 'कपी' पा॰ भे॰. l. 'मागुनी शीघ्र' पा॰ भे॰.

विरें सुग्रिवें क्षिप्र भट्टांशि द्वंदें । बळें झोडिलें वज्र मुष्टीस मैंदें ॥ ४८ ॥
द्विवीदा करें वज्रस्पर्शू निमाला । नळें ताडिलें शीघ्र [m]प्रातीपनाला ॥
रणीं लक्ष्मणें भेदिलें वीरूपाक्षा । चतुर्थांशि रामें शरें एक शिक्षा ॥ ४९ ॥
दळीं राक्षसांचे हाहाकार जाला । दळेंशीं बळें वीरूपाक्षू निमाला ॥
कपी राक्षसांची बहूसाल सेना । रणीं माजलें युद्ध तें वोहटेना ॥ ५० ॥
निशी प्राप्त जाली रणीं घोर मारें । महा वीर ते झुंझती अंधकारें ॥
बळें हाणती कोण कोणा कळेना । विरश्री-बळें मातले ते ढळेना ॥ ५१ ॥
पुढें शीघ्र चंद्रोदयो शुद्ध जाला । दिसों लागलें राक्षसां वानरांला ॥
रिपू हाणती येक मेकां कडाडां । नद्या वाहती शोणिताच्या भडाडां ॥ ५२ ॥
[n]कपी वीर चंद्रोदयाच्या उजेडें । बळें हाणती एकमेकां निवाडें ॥
दळें भांडती राक्षसां वानरांचीं । असंभाव्य भ्यासूर प्रेतें विरांचीं ॥ ५३ ॥
कपी तापले कोपले वीर जेठी । बळें ताडिले दैत्य कोट्यानुकोटी ॥
समारंगणीं आटली सर्व सेना । रणीं राक्षसां येश येतां दिसेना ॥ ५४ ॥
क्षयो प्राप्त जाला बहू राक्षसांतें । पुढें युद्ध आरंभिलें इंद्रजीतें ॥
दिसे पाहतां सर्व ही येश गेलें । तया राक्षसें शीघ्र कापट्य केलें ॥ ५५ ॥
अकस्मात तो इंद्रजीतू उडाला । नभोमंडळीं रावणी[28] गुप्त जाला ॥
पुढें घोर नीशाचरें ते चि काळीं । कपी पाडिले सर्व ही सर्प-जाळीं ॥ ५६ ॥
बहू सर्प झेंपावले व्योम-पंथें । बळें धांवती वानरी सैन्य जेथें ॥
महा काळ कर्कोट नाना परीचे । रणीं पाडिती भार गोळांगुळांचे[29] ॥ ५७ ॥
कपींची पडों लागली सर्व सेना । पुढें पाहतां युद्ध-कर्ता दिसेना ॥
गमे सर्व आकाश [30]व्याळें विखारीं । बळें झोंबती सर्प-कूळें जिव्हारीं ॥ ५८ ॥
कपी-भार ते सर्व निर्जीव जाले । निचेष्टीत ते राम-सौमित्र केले ॥
रिपू पाडिले थोर आनंद जाला । पुढें शीघ्र लंकापुरी माजि गेला ॥ ५९ ॥
नमस्कारिला राव तो आदरेशीं । तेणें पुत्र आलिंगिला सौख्य-राशी ॥
अती आदरें सुंदरें रम्य सारें । पिता अंगिचीं दे अलंकार [31]चीरें ॥ ६० ॥
म्हणे हो रणीं शांति केली रिपूंचीं । बळें सर्व ही त्या रिसां वानरांचीं ॥
बहूतां परी राव संतोषवीला । निरोपें चि तो भूवना माजि गेला ॥ ६१ ॥
बहू सूख जालें तया रावणाशीं । तेणें शीघ्र पाचारिलें त्रीजटेशीं ॥
म्हणे हो विमानीं सिता बैसवावी । रिपू मारिले शीघ्र तेथें चि न्यावी ॥ ६२ ॥
रणीं पाडिले ते तये दाखवावे । सिता वीट मानील ऐसें करावें ॥

m. 'प्रेतानलाला' पा० भे०. n. 'रणीं' पा० भे०. २८ रावणी=रावणाचा पुत्र. २९ गोलांगुल=वानर. ३० व्याल=साप. ३१ चीर=वस्त्र.

अनुक्रमणिका

बहूतां परी रावणें शीकविली । वना माजि ते त्रीजटा शीघ्र गेली ॥ ६३ ॥
पुसे जानकी ते तया त्रीजटेला । सभामंडपीं कोण वृत्तांत जाला ॥
म्हणे त्रीजटा सोडिं चिंता स्वभावें । रणामंडळा राज-आज्ञेस जावें ॥ ६४ ॥
अहो जानकी दुःख चिंतीन तूतें । तरी देह माझा पडो वज्र-घातें ॥
म्हणे सोडिं चिंता सिते सर्व कांहीं । तया लंकनाथा जयो प्राप्त नाहीं ॥ ६५ ॥
सिता ऐकतां शोक सांडूनि ठेली । तये त्रीजटेची बहू स्तुति केली ॥
पुढें बैसल्या शीघ्र दोघी विमानीं । रणामेदिनी पावल्या घोरवाणी ॥ ६६ ॥
पुढें पाहतां लक्ष कोट्यानुकोटी । रणीं पाडिले हुंबती वीर जेठी ॥
धडें तूटलीं राक्षसां वानरांचीं । शिरें दाटलीं घोर माहा विरांचीं ॥ ६७ ॥
भयासूर हा घोर संहार जाला । रणीं राक्षसां वानरां अंत आला ॥
असंभाव्य उत्पाटिले वृक्ष जैसे । रणीं भग्न केले महा वीर तैसे ॥ ६८ ॥
असंभाव्य ते तूटले पादपाणी । धडें मस्तकें थोर विक्राळवाणी ॥
बहू जाहली मेदैं[32]मांसें चिडाणी । महा दर्प ते माजली वरढाणी ॥ ६९ ॥
रणीं येक ते छेदिले सर्व अंगीं । तेणें काळिजें दीसती पृष्ठि-भागीं ॥
शिरें तोडिलीं मेंदु नीघे बरारां । बहू घाय ते रक्त वाहे झरारां ॥ ७० ॥
कितीएक ते वीर जाले उताणे । किती पालथे दीसती दैन्य वाणे ॥
कितीएक ते वीर घालूनि मेटें । भुमि पीटिती थोर दुःखें ललाटें ॥ ७१ ॥
कितीएक भूमी वमीती अशुद्धें[33] । कितीएक ते मोडले माज मध्यें ॥
कितीएक ते वीर चौरंग जाले । कितीएक ते दूधडी भग्न केले ॥ ७२ ॥
कितीएक ते मुंडकीहीन जाले । कितीएक वक्षस्थळीं चूर्ण केले ॥
कितीएक तीं तूटलीं जानु घोटीं । कितीएक ते कंठ बोटीं ललाटीं ॥ ७३ ॥
कितीएक वोटारिती तीव्र डोळे । निघाले बहू पोटिंचे मांस-गोळे ॥
पितें चारटें फोफसें रक्त मेंदू । शिसें^o आंतडीं कातडीं मूळ कंदू ॥ ७४ ॥
कितीएक जालीं शिरें चूर चेंदा । बहू दाटलासे रणीं रक्त-रेंदा ॥
कितीएक हुंकारिती दैन्यवाणी । कितीएक^p ते मागती अन्न-पाणी ॥ ७५ ॥
कितीएक ते खूंडिती पाद-पाणी । कितीएक ते शब्द कारुण्य वाणी ॥
कितीएक ते दंशिती भूमि दंतीं । कितीएक ते लागले मृत्यु-पंथीं ॥ ७६ ॥
शिरें राक्षसांचीं धडें वानरांचीं । रणीं लागलीं एकमेकां विरांचीं ॥
विरा शकटा कुंजरा-घोडियांचीं । रिसां वांनरां सर्व इत्यादिकांचीं ॥ ७७ ॥
नदी शोणिताचे महापूर जाती । धडें कोथळे फूगले वाहताती ॥

---

३२ मेद=चरबी. ३३ अशुद्ध=रक्त. o. 'किती' पा० मे०. p. 'घोरती' पा० मे०.

शिरें पाद-पाणी बहू मांस-माळा । धनू खेटकें[34] भातड्या त्या विशाळा ॥ ७८ ॥
गिधें श्वापदें तीं असंभाव्य आलीं । स्वइच्छा बहू मांस भक्षूं निघालीं ॥
भुतें सर्व ही औटें[35] कोटी मिळालीं । बहूतां परीचीं बहू तृप्त जालीं ॥ ७९ ॥
पुढें जानकी बोलिली त्रीजटेशीं । रणीं पाडिलें सर्व हा [q]वानरांशीं ॥
महा वीर ते कोण वेळ्या तयांतें । म्हणे त्रीजटे दाखवीं सर्व मातें ॥ ८० ॥
रणीं त्रीजटा दाखवी जानकीशीं । महा वीर ते पाडिले नाग-पाशीं ॥
दिसे राम सौमित्र तो ही निमाला । पुढें जानकीनें महा शोक केला ॥ ८१ ॥
बहूतां परी जानकी शांत केली । तये त्रीजटा शीघ्र घेऊनि गेली ॥
समाचार सांगे तया रावणाला । वना माजि आली सिता रक्षणाला ॥ ८२ ॥
कपी सर्व ही पावले मृत्यु-पंथू । जिती मारुती आणि नैर्ऋत्य-नाथू ॥
जया लागिं जाली दया राघवाची ॥ पहाया तया शक्ति काळाशि कैंची ॥ ८३ ॥
रणें शोधिलीं सर्व बीभीषणानें । विरां लागिं अश्वासिलें थोर मानें ॥
पुढें दृष्टिनें पाहिलें राघवानें । गरूडास्त्र नीरूपिलें व्योम जानें ॥ ८४ ॥
तया लागिं प्रायोजिलें शीघ्र पंथें । असंभाव्य झेंपावले व्योम पंथें ॥
उड्या घालिती पक्षि[r] कूळें झडाडां । बळें तोडिती सर्प कूळें तडाडां ॥ ८५ ॥
विहंगीं तिहीं सर्प संहार केला । कपी-भार तो मोकळा सिद्ध जाला ॥
गिरी-शीखरीं सर्व सेना घडाडी । त्रिकूटा चळीं घोष तेणें धडाडी ॥ ८६ ॥
म्हणे रावणू थोर आश्चर्य जालें । कपी-चक्र तें सर्व निर्जीव केलें ॥
सुतें वैरियां दाविली थोर ख्याती । रणीं मागुती ते कपी गर्जताती ॥ ८७ ॥
रणीं शत्रु जिंकील धूम्राक्ष नामा । तया पाठवीजे प्रभू सार्व-भौमा ॥
पुढें मंत्र ऐकोऽनका[s] मंत्रियांचा । वदे रावणू आदरें त्याशि वाचा ॥ ८८ ॥
म्हणे गा विरा शीघ्र तूं ये प्रसंगीं । रिपू लागिं मारावया जाय वेगीं ॥
अलंकार देऊनियां तोषवीला । महा वीर धूम्राक्ष युद्धा निघाला ॥ ८९ ॥
रणीं वीर धूम्राक्ष तो वज्रदंष्ट्री । निजा अंकपू चालिला भार पृष्ठी ॥
रणामंडळीं थोर संहार केला । पुढें राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला ॥ ९० ॥
बहू युद्ध केलें तया राक्षसानें । महावीर धूम्राक्ष त्या अंकपानें ॥
बळें दोघे ही मारिले मारुतानें । रणीं वज्रदंष्ट्री[t] तथा अंगदानें ॥ ९१ ॥
महा वीर ते झुंजतां भग्न जाले । बहूसाल घायाळ धाकें पळाले ॥
तिहीं सर्व सांगितली युद्ध-वार्ता । तेणें रावणा मानशीं थोर चिंता ॥ ९२ ॥
रणीं राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला । प्रहस्तू पुढें शीघ्र युद्धा निघाला ॥

---

३४ खेटक=ढाल. ३५ औट=साडे तिन. q. 'नागपाशीं' पा० भे०. r. 'पक्षवातें पा० भे०. s. 'ऐकूनियां' पा० भे०. t. 'वज्रदृष्टी' पा० भे०.

कपी राक्षसां थोर संहार जाला । निळें झोडिला पाडिला भग्न केला ॥ ९३ ॥
पुढें रावणू चालिला त्वरा वेगें । तया लागिं मंदोदरी नीति सांगे ॥
न मानीत तो चालिला आंवरेना । बळें लोटली ते असंभाव्य सेना ॥ ९४ ॥
महा वीर झुंझार ते भार आले । बहूसाल शृंगार-मंडीत जाले ॥
बळें पुत्र-प्रधान-मेळा मिळाला । रणामंडळा रावणू शीघ्र आला ॥ ९५ ॥
बहू त्रासिलें सैन्य गोळांगुळांचें । रिपू-बाण-जाळें बहू सैन्य[प] खोंचे ॥
महा वीर ते ही बळें भग्न केले । पळाले कपी राघवा आड गेले ॥ ९६ ॥
बहू त्रासिलों राक्षसांचेनि बाणीं । कपी-भार ते बोलिले दैन्य वाणी ॥
चळें कांपती खोंचतां देति धापा । बळें रक्षि गा राघवा मायबापा ॥ ९७ ॥
तया देखतां राम कार्मूक[३६] वोढी । पुढें शीघ्र सौमित्र तो हात जोडी ॥
म्हणे वीर तो स्थीर व्हावें समर्थे । करी तों बळें भग्न त्या रावणातें ॥ ९८ ॥
रणीं रावणा वीर सामर्थ्य नेलें । नटे नीळ माया तया भग्न केलें ॥
पुढें शीघ्र पाचारिलें रावणाला । महा वीर सौमित्र युद्धा निघाला ॥ ९९ ॥
सुमित्रा-सुता रावणा युद्ध आतां । पुढें देइजे आदरें चित्त श्रोतां ॥
म्हणे दास हा वीर कोदंड-पाणी । रणीं रावणा लागिं त्रासील बाणीं ॥ १०० ॥

प्रसंग ३ रा समाप्त.

---

## चवथा प्रसंग प्रारंभ.

दशाशीर सौमित्र युद्धा निघाले । समारंगणीं वीर सन्मूख जाले ॥
महा वीर संग्राम आवेश पोटीं । पुढें देखिलें येकमेकांसि दृष्टी ॥ १ ॥
बहूसाल धिःकारिलें येरयेरां । बहू सोडिलीं बाण-जाळें सरारां ॥
दळीं टाकिती थोर शस्त्रें शरांचीं । बळें तोडिती येकमेकां विरांचीं ॥ २ ॥
रणीं भीडतां हाणिती एकमेकां । म्हणे रावणू वीर[a] हा थोर नीका[३७] ॥
पुढें शक्ति काढूनियां ब्रह्मयाची । बळें सोडिली वोळि विद्युल्लतेची ॥ ३ ॥
शरें वारितां बैसली शक्ति अंगीं । रणीं वीर सौमित्र तो देह त्यागी ॥
पुढें धांवला रावणू शीघ्र तेथें । बळें ताडिता जाहला मुष्टि-घातें ॥ ४ ॥
तया देखतां मारुती कोप आला । अकस्मात तो व्योम[३८]-पंथीं उडाला ॥
कठोरें करें ताडिलें वज्रमुष्टी । वमूं[३९] लागला रावणू रक्त सृष्टी[४०] ॥ ५ ॥
रिपू रावणू मागुता शीघ्र गेला । पुढें लक्ष्मणू ऊठला स्वस्थ जाला ॥

---

प. 'साल' पा० भे०. ३६ कार्मुक=धनुष्य. a. 'लक्ष्मणू वीर' पा० भे०. ३७. नीका =चांगला. ३८. व्योम=आकाश. ३९. वमूं=ओकूं. ४०. सृष्टि=प्रवाह.

पुन्हा[b] रावणू कोपला काळ रूपी । विरां राक्षसां माजि चंड प्रतापी ॥ ६ ॥
दहा मस्तकीं त्या दहा दिव्य छत्रें । पताका बहू मत्स्य[41][c] मार्तंड[42]-पत्रें ॥
महा वैभवेंशीं रथा रूढ जाला । तया मागुती थोर आवेश आला ॥ ७ ॥
बहू बाण जुंबाड वाहोनि पृष्टीं । दहा ही धनुष्ये करीं दृढ मुष्टी ॥
करूं लागला मागुती बाण-वृष्टी । रघूनायकें देखिलें त्यासि दृष्टी ॥ ८ ॥
उभा राहिला राम वज्रांग ठाणें । करीं सज्जिलें चाप चंद्रार्ध-बाणें ॥
दहा हेम[43] मूगूट छत्रें धनुष्यें । बळें तोडिलीं पाडिलीं तीं निमेषें[44] ॥ ९ ॥
पुढें रावणू तो भयातूर जाला । बहूतां परी राघवें शीकवीला ॥
म्हणे जाइं रे रक्षिलें आजि तूला । रिपू प्राण घेऊनि तैसा पळाला ॥ १० ॥
महा मेघनादू असे नाम ज्यासीं । पळे लंकनाथा सवें तो त्वरेशीं ॥
तया सारिखीं मूढ मूढें मिळालीं । रणीं भ्रष्टलीं सर्व मागें पळालीं ॥ ११ ॥
न पाहात मागें पुरी माजि गेले । विरां माजि कोणी कुणासी न बोले ॥
पुढें सर्व ही मंडपा माजि आले[d] । समस्तांसि तो रावणू काय बोले ॥ १२ ॥
भयातूर लंकापती दैन्य वाणा । म्हणे ऊठवा हो बळें कुंभकर्णा ॥
तया वीण आणीक कोणी दिसेना । रिपू घोर हा थोर संहारवेना[e] ॥ १३ ॥
पुढें धाडिले शीघ्र माहोदराला । महा घोर वाद्यें दळें सिद्ध जाला[f] ॥
कितीएक ते धीट मोठे[g] पळाले । कितीएक पोटीं भयातूर जाले ॥ १४ ॥
निजेला दरी भीतरी कुंभकर्णू । दिसे [h]काळ विक्राळ तो मेघवर्णू ॥
शरीरें भयासूर हा घोर रूपी । विरां भासला मृत्यु येमस्वरूपी ॥ १५ ॥
तया ऊठवीतां भयातूर जाले । महा वीर ते कंप अंगीं उदेले ॥
पुढें जाहले धीट ते नेट पाटें । उभीं पाहती सर्व नैरृत्य[45] थाटें ॥ १६ ॥
बहूसाल वाद्यें बहूतां परीचीं । महा कर्कशें चंड घोर ध्वनीचीं ॥
तयाच्या पुढें जाहला एक वेळा । नभोमंडळीं नाद गेला भुगोळा ॥ १७ ॥
गदा [46]तोमरें हाणती वज्र घातें । महा मार आरंभिला राक्षसांतें ॥
कळा लाविती टाकिती वृक्ष नाना । गळाले परी कुंभकर्णू उठेना ॥ १८ ॥
शिळा टाकिती टोंचिती शूळ शस्त्रें । महा घोष संपूर्ण तो कर्ण पात्रें ॥
बळें लोटले मस्त ते हस्ति वेगीं । शरीरावरी चालती ते प्रसंगीं ॥ १९ ॥
विरा ऊठवाया बहू यत्न केला । परी नूठतां सर्वही व्यर्थ गेला ॥

---

b. 'पुढें' पा० भे०. ४१ मत्स्य=मासा. c. 'दिव्य' पा० भे०. ४२. मार्तंड=सूर्य. ४३. हेम=सोनें. ४४. निमेष=अत्यल्प काळ. d. 'गेले' पा० भे०. e. 'नीवारवेना' पा० भे०. f. बळेंशीं निघाला' पा० भे०. g. 'मांगें' पा० भे०. h. 'वीर' पा० भे०. ४५ नैऋत्यथाट=राक्षसमंडळी. ४६. तोमर=शस्त्रविशेष.

